**मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी (MMGSY)**
**वित्तीय अधिकाराचे विकेंद्रीकरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग,**
शासन निर्णय क्रमांकः ग्रासयो २०१८/प्र.क्र.२३९/बांधकाम-१
बांधकाम भवन, ७ वा मजला, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई ४०० ००१.
दिनांक: २५ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा-**

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास व जलसंधारण विभाग ग्रासयो-२००९/प्र.क्र.११३/यो-८, दिनांक ०९.०९.२०१०.
२) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रामविकास व जलसंधारण विभाग ग्रासयो-२०१२/प्र.क्र.११३/यो-८, दिनांक २५.०९.२०१२.
३) **केंद्र शासनाचे पत्र क्र.** पी-१७०२५/३३/२०११/पी-३/रा.ग्रा.र.वि.सं., दि.०७.०५.२०१३.
४) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रामविकास व जलसंधारण विभाग ग्रासयो-२०१२/प्र.क्र.२७५/यो-८, दिनांक २०.०७.२०१३.
५) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रामविकास व जलसंधारण विभाग ग्रासयो-२०१३/प्र.क्र.४४६/यो-८, दिनांक १०.१२.२०१३
६) **शासन निर्णय क्रमांकः** सार्वजनिक बांधकाम विभाग विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२, दिनांक १६.१२.२०१५.
७) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रामविकास व जलसंधारण विभाग ग्रासयो-२०१६/प्र.क्र.३३१/यो-८, दिनांक ३०.०७.२०१६.

**प्रस्तावनाः-**

प्रधानमंत्री ग्रामसडक योजना ही केंद्र शासनाची कालबद्ध स्वरुपाची महत्वाकांक्षी योजना आहे. सदर योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेमार्फत करण्यात येत आहे. प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या धर्तीवर, राज्यशासन पुरस्कृत मुख्यमंत्री ग्रामसडक योजना सुरु करण्यात आली असून, सदर योजनेची अंमलबजावणी ही महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेमार्फत करण्यात येत आहे.

२. ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांचेकडून प्राप्त मार्गदर्शक सुचनांस अनुसरुन संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेसाठी महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेच्या वित्तीय अधिकारांमध्ये वेळोवेळी सुधारणा करण्यात आली आहे. तथापि, मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेची कामे जलदगतीने व विहित वेळेत पूर्ण करण्याच्या दृष्टीने मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी वित्तीय अधिकारांचे क्षेत्रियस्तरावर विकेंद्रीकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

प्रस्तावनेत नमुद केल्यानुसार, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेंतर्गत मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी, मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेच्या कामांबाबत खालीलप्रमाणे वित्तीय अधिकारांमध्ये सुधारणा करण्यात येत आहे.

(१) कार्यकारी अभियंताः-

(अ) तांत्रिक मान्यता अधिकार- रु.१०० लक्षच्या मर्यादेत.

(ब) प्रारुप निविदा प्रपत्र मंजूरी अधिकार- रु.१०० लक्षच्या मर्यादेत.

(क) निविदा स्विकृती अधिकार- रु.१०० लक्षच्या मर्यादेत -- संबंधित कार्यकारी अभियंता यांच्या अध्यक्षतेखालील समिती (समिती अध्यक्ष-कार्यकारी अभियंता, समिती सदस्य- उप अभियंता (DPIU) व कनिष्ठ लेखाधिकारी (गट-क).

(ड) मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेच्या कामांची देयके कंत्राटदारास प्रदान करण्याचे अधिकार अधीक्षक अभियंता यांचेऐवजी संबंधित जिल्ह्याचे कार्यकारी अभियंता यांना प्रदान करण्यात येत आहेत.

(२) अधीक्षक अभियंताः-

(अ) तांत्रिक मान्यता अधिकार- रु.१०० लक्ष ते रु.२५० लक्षच्या मर्यादेत.

(ब) प्रारुप निविदा प्रपत्र मंजूरी अधिकार- रु.१०० लक्ष ते रु.२५० लक्षच्या मर्यादेत.

(क) निविदा स्विकृती अधिकार- रु.१०० लक्ष ते रु.२५० लक्षच्या मर्यादेत (प्रचलित दर सुचीप्रमाणे) व रु.१०० लक्ष पर्यंत (प्रचलित दर सुचीपेक्षा ५% पर्यंत जादा दराने) -- संबंधित अधीक्षक अभियंता यांच्या अध्यक्षतेखालील समिती (समिती अध्यक्ष-अधीक्षक अभियंता, समिती सदस्य- संबंधित कार्यकारी अभियंता व कनिष्ठ लेखाधिकारी (गट-ब).

(३) मुख्य अभियंताः-

(अ) तांत्रिक मान्यता अधिकार- रु.२५० लक्ष पुढील पूर्ण अधिकार.

(ब) प्रारुप निविदा प्रपत्र मंजूरी अधिकार- रु.२५० लक्ष पुढील पूर्ण अधिकार.

(क) निविदा स्विकृती अधिकार- रु.२५० लक्ष ते रु.१५०० लक्ष पर्यंत (प्रचलित दर सुचीप्रमाणे) व रु.१०० लक्ष ते रु.२५० लक्षपर्यंत (प्रचलित दर सुचीपेक्षा ५% पर्यंत जादा दराने) -- मुख्य अभियंता यांच्या अध्यक्षतेखालील समिती (समिती अध्यक्ष-मुख्य अभियंता, समिती सदस्य- संबंधित अधीक्षक अभियंता, राज्य गुणवत्ता समन्वयक व सहाय्यक लेखाधिकारी (AAO) (गट-ब).

(ड) प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांचे मुख्यालय मध्यवर्ती ठिकाण असलेल्या “पुणे” या ठिकाणी ठेवण्यात येत आहे.

(४) शासनस्तरः-

(अ) निविदा स्विकृती अधिकार -- रु.१५०० लक्ष पेक्षा जास्तीच्या कामाचे पूर्ण अधिकार व रु.२५० लक्ष ते रु.१५०० लक्ष कामाचे (प्रचलित दरसुची पेक्षा जादा दराने) -- सचिव, मुमंग्रासयो यांच्या अध्यक्षतेखालील समिती (समिती अध्यक्ष- सचिव, मुमंग्रासयो, समिती सदस्य- मुख्य अभियंता व वित्तीय नियंत्रक).

२. जर निविदा स्विकृतीमुळे कामाच्या अंदाज पत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता असल्यास, त्यास सुधारीत प्रशासकीय मान्यता घेवूनच पुढील आवश्यक कार्यवाही करण्यात यावी.

३. वित्तीय अधिकारांमधील उपरोक्त सुधारणा या फक्त मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी असून प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेसाठी यापूर्वीच्या शासन निर्णयान्वये/परिपत्रकान्वये निर्धारित केलेल्या कार्यपद्धतीप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२५१६४९१४९३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Nathlya Valvi

Digitally signed by Prakash Nathlya Valvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=37e23389b57a9e7ec7b19b76a580789713f16034880d23f1579f9f010c94459d, cn=Prakash Nathlya Valvi
Date: 2018.10.25 17:08:33 +05'30'

( प्रकाश वळवी )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद / विधानसभा,
२. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
३. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा) मुंबई/नागपूर
६. मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) ग्रामविकास विभाग, मंत्रालय,मुंबई
७. प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक, बांधकाम भवन, मुंबई
८. उपसचिव आस्थापना/अर्थसंकल्प, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
९. राज्य गुणवत्ता समन्वयक (प्रमंग्रासयो), पुणे
१०. अधीक्षक अभियंता (प्रमंग्रासयो) (सर्व)
११. कार्यकारी अभियंता (प्रमंग्रासयो) (सर्व)

१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१३. निवासी लेखाधिकारी, मुंबई
१४. श्री.सुनिल चि.मोने, सनदी लेखापाल वित्तीय नियंत्रक, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना,यांना सुचित करण्यात येते की, वित्तीय अधिकारांमधील उपरोक्त सुधारणानुसार आवश्यक कार्यवाही तात्काळ करण्यात यावी.
१५. आय.टी.नोडल अधिकारी तथा कार्यकारी अभियंता (प्रमंग्रासयो), नवीन प्रशासकीय भवन, तिसरा मजला, कौन्सिल हॉलसमोर, पुणे ४११ ००१.
१६. वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ-१७/वित्तीय सुधारणा-१/आ.पु.क.), मंत्रालय,मुंबई
१७. कार्यासन अधिकारी (आस्थापना-१/रोख शाखा/वित्त-१/बांधकाम-२), ग्रामविकास विभाग, मंत्रालय,मुंबई
१८. निवड नस्ती (बांधकाम-१), ग्रामविकास विभाग, मंत्रालय,मुंबई.